**जलसंपदा विभागास (तत्कालीन पाटबंधारे विभाग)**
**प्रदान केलेले वित्तीय अधिकार रद्द करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
शासन निर्णय, क्रमांक - विअप्र-१०.०४/प्र.क्र.३३/२००४/विनियम
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
**दिनांक - २९ नोव्हेंबर, २००५**

**शासन निर्णय**

**प्रस्तावना :-** शासन निर्णय, पाटबंधारे व ऊर्जा विभाग, क्रमांक : एपीएस - १०७३/३२६५३ - इ (३), दिनांक १७ जुलै, १९७४ नुसार पाटबंधारे विभागात आंतर वित्तीय सल्लागार आणि उप सचिव पदाची निर्मिती करण्यात आली व त्या विभागास जेथे मोठया प्रमाणात खर्च अंतर्भूत आहे त्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार प्रदान करण्यात आले आहेत.जलसंपदा विभागाने ( तत्कालीन पाटबंधारे विभाग )आपल्या प्रदत्त अधिकारात फार मोठया प्रमाणात वित्तीय भार असलेल्या प्रकल्पांस परस्पर मान्यता दिल्याचे शासनाच्या निदर्शनास आले आहे व अशाप्रकारे मोठया प्रमाणात वित्तीय भार असलेल्या प्रकल्पांस परस्पर मान्यता दिल्यामुळे अशा प्रकल्पांची कामे भविष्यामध्ये निधी उपलब्धतेविना प्रलंबित राहतील किंवा अन्य कामावरील निधी कमी करुन किंवा ती कामे बंद करुन या प्रकल्पांसाठी तरतूद उपलब्ध करुन देणे क्रमप्राप्त राहील. जलसंपदा विभागाने (तत्कालीन पाटबंधारे विभाग) शासनाची एकंदरीत आर्थिक स्थिती लक्षात न घेता प्रदत्त अधिकारात निर्गमित केलेले प्रशासकीय आदेश हे भविष्यात शासनावर फार मोठे आर्थिक दायित्व निर्माण करतील आणि त्यामुळे आर्थिक संतुलनावर परिणाम होईल. शासनाची सद्याची आर्थिक स्थिती पहाता अशी मोठी आर्थिक जबाबदारी शासनास स्विकारणे शक्य नाही. यास्तव शासन निर्णय, पाटबंधारे विभाग, क्रमांक - एपीएस-१०७३/३२६५३ - इ (३), दिनांक १७ जुलै, १९७४ अन्वये जलसंपदा विभागास (तत्कालीन पाटबंधारे विभाग) देण्यात आलेले प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार सुधारीत करण्याबाबतचा विचार शासनस्तरावर चालू होता.

**निर्णय** :-

त्यानुसार विचार विनिमयाअंती शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतले आहेत :-

१) शासन निर्णय, पाटबंधारे विभाग, क्रमांक - एपीएस-१०७३/३२६५३-इ(३),दिनांक १७ जुलै, १९७४ नुसार त्या विभागास देण्यात आलेले प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार याद्वारे रद्द करण्यात येत असून, रु. ५ कोटी पर्यंतच्या लघु पाटबंधारे प्रकल्पांना प्रशासकीय मान्यता देण्याबाबतचे अधिकार जलसंपदा विभागास देण्यात येत आहेत.

२) मोठया व मध्यम पाटबंधारे प्रकल्पास मंजूरी देण्याबाबतचे प्रशासकीय आदेश काढण्यापूर्वी प्रत्येक प्रस्तावास वित्त विभागाची मान्यता घेण्यात यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**( ना. हे. सोनारे )**
**शासनाचे अवर सचिव**

**प्रति,**

* १. प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र,मुंबई ४०० ०२०
* २. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई ४०० ०२०

* ३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर
* ४. महालेखापाल (लेखा परीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर

५. मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव

६. मा. उप मुख्य मंत्र्यांचे प्रधान सचिव

७. सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई ३२

८. मा. मंत्री , जलसंपदा यांचे स्वीय सहाय्यक

९. मा. राज्यमंत्री, जलसंपदा यांचे स्वीय सहाय्यक

१०. जलसंपदा विभागाच्या अधिपत्याखालील सर्व कार्यालये

११. मंत्रालयातील सर्व प्रशासनिक विभाग

१२. अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे (पूर्व), मुंबई ४०० ०५१

१३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

१४. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई

१५. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई

१६. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी

१७. सर्व उप कोषागार अधिकारी

१८. सर्व जिल्हाधिकारी

१९. वित्त विभागातील सर्व कार्यासने

२०. निवड नस्ती, विनियम, वित्त विभाग